संपादकीय-

# शिवरायांचा आठवावा प्रताप।। अनुसरण्यासाठी ।।

**'या वसुंधरेने गेल्या पाच हजार वर्षात असा क्षत्रिय जन्माला घातला नाही'**

असे स्वामी विवेकानंदांनी केलेलं त्यांचं वर्णन. एक श्रीमानयोगी आदर्श राज्यकर्ता क्षात्रधर्म आणि राजधर्माचं पालन करणारा राजा.

राजा शिवछत्रपती एक युगप्रवर्तक दुर्दम्य ईच्छाशक्तीने, जीवाला जीव देणा-या मावळयांसोबत सह्याद्रीच्या कडेकपारीतून दिल्लीच्या तख्तापर्यंत गर्जना करीत स्वराज्याची स्थापना करून ज्याने इतिहास घडविला तो हा राजा.

शिवराय हे फ़क्त मराठी जनतेचेच नव्हे तर समस्त हिंदुंचं आदरस्थान.

**'काशी की कला जाती**
**मथुरा मस्जिद होती**
**शिवाजी न होते**
**तो सबकी सुन्नत होती'**

या शब्दात कवी भुषण यांनी छत्रपतींचा ग़ौरव केला आहे

यजमान वैभवशाली इतिहास असलेल्या महाराजांचा राज्यकाळ ६ जून १६७४ पासून ते ३ एप्रिल १६८० पर्यंतचा, पश्चिम महाराष्ट्र कोकणा सह्याद्री डोंगरांपासून नागपूर पर्यंत आणि उत्तर महाराष्ट्र खानदेश पासून दक्षिण भारतात तंजावर पर्यंत स्वराज्याची व्याप्ती होती. रायगड ही स्वराज्याची राजधानी. ६ जून १६७४ साली राजांचा राज्याभिषेक करण्यात आला.

स्वराज्याची ही यशस्वी आणि तेजोमयी वाटचाल त्याकाळी ग़निमांवर झेपावली होती. असा जाणता राजा महाराष्ट्राला लाभला याचा या मातीला सार्थ अभिमान.

आज महाराजांची जयंती **'मराठा तितुका मेळवावा महाराष्ट्र धर्म वाढवावा'** हा रामदास स्वामींनी त्यावेळी दिलेला संदेश पण सद्य काळात त्याची खरी गरज आहे. माहीती तंत्रज्ञानाला हाताशी घेऊन उज्वल भविष्याकडे वाटचाल करणा-या आजच्या पिढीने आपला इतिहास विसरू नये म्हणून आणि 'जय भवानी जय शिवाजी' हे दोन शब्द अजूनही कानावर पडताच ज्यांचे रक्त उसळते अश्या मराठी मनासाठी नेटाक्षरीने केलेला हा अट्टाहास.

आज मराठी भाषेची ध्वजा कोमेजल्या सारखी झाली आहे. ज्ञानेश्वर तुकारामांसारख्यांच्या या भाषेला तिच्या योग्य अशा उच्च स्थानी नेण्याची जबाबदारी आजच्या तरूण पीढीवर आहे. आणि नेटयुगातली ही तरुणाई आपले कर्तव्य बजावताना शिवरायांचाच प्रताप आठवेल, आणि अनुसरेल याची आम्हाला ग्वाही आहे. साता समुद्रापार ही मराठी भाषा आपले भगवे वैभव उधळीत सातही खंड पादाक्रांत करील याचा विश्वास आहे.

जय शिवराय ! जय महाराष्ट्र !!


यजमान संपादक –
**सचिन काकडे (मुंबई )**
सहसंपादक
**सोनाली घाटपांडे ( पुणे )**
**स्वप्ना कोल्हे ( नाशिक )**
**अहं ब्रह्मास्मि ( पुणे )**
**नाम गुम जायेगा ( ठाणे )**
**सुरुचि नाईक ( नागपूर )**
**आनंद माने (सोलापूर)**




राजाधिराज महाराज शिवराय राजा शिवछत्रपती
कर्तव्यदक्ष सिन्हासनाधीश छत्रपती शिवराय छत्रपती शिवछत्रपती
भुपती प्रजापती, सुवर्णरत्न श्रीपती अष्टावधान जाग्रत अष्टाप्रधान वेष्टित
नानालंकारमंडित शस्त्रास्त्रशास्त्रपारंगत राजनितीधुरंधर प्रौढप्रतापपुरंदर
क्षत्रियकुलावदौस सिन्हासनाधिश्वर गोब्राह्मणप्रतिपालक श्रीमंत
श्री छत्रपती श्री शिवरायांच्या चरणी मानाचा मुजरा ...

कण्हत्या सह्याद्रीच्या पोटी
जन्म शिवाचा झाला
आणि दख्खनच्या दिशादिशातून
झंकार शिवशाहीचा झाला



आर्यांच्या या भुमीवरी
म्लेच्छांनी घातला घाला
धावला शिवा मातीला ताराया
शिवा मातीचा त्राता झाला
झंकार शिवशाहीचा झाला

मर्द मराठ्यांच्या नसानसातून
तव भडकली केशरी ज्वाला
गनिमांचे भेदित छाताड
वीर मराठा पुढे निघाला
झंकार शिवशाहीचा झाला

स्वातंत्र्याच्या रणसंग्रामी
शिवतेजाचा झोत उफ़ाळून आला
सह्याद्रीच्या कडे कपारी
विजयी उषःकाल झाला
झंकार शिवशाहीचा झाला

जय भवानी जय शिवाजी !

**- पार्टनर ( मी तुमचंच मन )**

## मातीस माय बोलून दहाडते मराठी

अन्याय तोच जेंव्हा लागे कुणा जिव्हारी
तलवार तीथ शीवाची काढते मराठी

भूमी जहाल वीरांची हीच मांदियाळी
क्रांती अशी गनिमांना गाडते मराठी

ओढून भव्य मृत्यू संसार सोडलेला
आयुष्य राष्ट्र उद्धारा झाडते मराठी

अभंग ऐकता नीळोबा असा रंगला
ज्ञानेश्वरी ही ज्ञानाची वाढते मराठी

काव्यात शब्द आता गाण्यात सुर माझ्या
माझ्या सुमार गझलेत उनाडते मराठी

**- सुधीर मुळीक**



## माझी माय

तलवारीला लाभो
लेखणीची साथ
राहो उंच हात
मराठीचा

दशदिशा उठो
शिवाचा गजर
मराठीचे घर
उजळावे

एक एक हार
सत्याचा प्रहार
काव्य आणि शर
एक व्हावे

जगात मानाने
जगो माझी आई
याच्यासाठी घाई
अट्टाहास

**- नाम गुम जायेगा**

## उदयोस्तु उदयोस्तु होऊ दे

उदयोस्तु उदयोस्तु होऊ दे
आई अंबे ।।
पुन्हा एकदा शिवबा जन्मुदे
दे माय दे दान पदरात
महाराष्ट्र भुमी भरभरू दे

पुन्हा एकदा जिजाऊ जन्मूदे
माते, महाराष्ट्र लक्ष्मी जन्मू दे
सावरण्या या महाराष्ट्रभूमीस
पुन्हा एकदा शिवबा जन्मू दे

उदयोस्तु उदयोस्तु होऊ दे

आई पाजळतो पोत आता
गोंधळ मांडीला आई तुझा
पदर पसरतो आई माते
पुन्हा एकदा शिवबा जन्मूदे

उदयोस्तु उदयोस्तु होऊ दे

बघ चालला रक्तपात कैसा
नव्या यवनांचा थैमान चालला
महाराष्ट्रधर्म पुन्हा जागूदे
पुन्हा एकदा शिवबा जन्मूदे

उदयोस्तु उदयोस्तु होऊ दे



शासन करण्या अपराध्यास
न्यायव्यवस्था प्रबळ होऊ दे
जिजाउंची जरब संस्थापूदे
पुन्हा एकदा शिवबा जन्मूदे

उदयोस्तु उदयोस्तु होऊ दे

माते उघड उघड दार आता
अवघे आंदोळते आहे महाराष्ट्र
शिवशाही पुन्हा संस्थापूदे
पुन्हा एकदा शिवबा जन्मू दे

उदयोस्तु उदयोस्तु होऊ दे
दे माये दे दान पदरात
महाराष्ट्र भुमी भरभरू दे

**- अमित वि. डांगे**

## बाजीप्रभूंचे विजयोद्गार

लढेन मी लढेन मी
मृत्यूकडा हा चढेन मी

धडधडेल ना हे ह्रदय जरी
फडफडतील हे बाहु परी
शत्रुवरती खड्गाविशाखा
अस्मानातून पडेन मी

शत्रुसेना मृत्यूसेना
उडेल दोघांचीही दैना
पराक्रम हा पराकोटीचा
कोटीकोटी मुंड खुटेन मी

धीर नको रुधिर हवे
यमयज्ञाला शीर हवे
तोषवीन मी काळभैरवा
तदनंतरच पडेन मी
भुजा नव्हे या तलवारी
कंठ नव्हे महातुतारी
ऊर नव्हे ढाल अभेद्य
मृत्यूमुशीतून घडेन मी

आवेष हा वेष नव्हे
त्वेष हा द्वेष नव्हे
रक्त पिऊनी खड्गाने
ऊर फ़ाडूनी रडेन मी



नरमुंड्या धारूनी रणचंडी
कृतांतकटकाची दिंडी
वाजतगाजत वायुवरती
मृत्यूसुगंधित उडेन मी

दरी नव्हे ही यमोदर
मृत्यू भासे सहोदर
अकाल काळा तोषविण्या
खिंडीमध्ये जडेन मी

शत्रु भले असो दिलेरीचा
छावा लढतो शीवकेसरीचा
अखेर 'बाजी' जिंकण्यासाठी
खिंडीमध्ये भिडेन मी

विझण्याचे केवळ एकच कारण
प्राण ठेवले त्यास्तव तारण
फैरी झाडता तोफ़ बुलंदी
मृत्यूकड्यावरून पडेन मी

**- सारंग भणगे**

## शिवबा माझा राजा

काळीज तुटलं शिवबाचं
काय ही माझ्या राष्ट्रावर वेळ आली
विकला माझा राष्ट्र त्यांनी आज
दुस-यांदा शिवबाची जयंती साजरी झाली

अरे लेक हो.. सुर्य तिथेच आहे
तो कधीही मावळत नाही
त्याची प्रखरता इतकी आहे आज की
तुम्ही उंचावून पाहू शकणार नाही

लाज वाटावी आज मराठी माणसाला
उप-यांसाठी आज तो इतका लढतो
आणि ज्या राष्ट्रासाठी प्राण अर्पिले
त्या शिवबाच्या हक्कासाठी तो मागे पडतो

शासकीय सुट्टी म्हणजे जयंती नव्हे
माझ्या राजाबद्दल मनात प्रेम हवे
सांगा शासनाला नको ती जयंती नको ती रजा
प्रत्येक दिवशी जन्माला येतोय...
ह्रदयात माझा राजा

**- अमरिश भिलारे**



## आजची जिजाई.. !!

गोष्ट कालची जी जाणून आई
काळ आजचा जी जोखून आई
शिवा देहात जी जोपासून आई
मावळा खुद्द जी जोडते आई
रणी ठाकून जी झुंजते आई
शिवबा पाठिस जी बांधते मराठी
पाहते तळपते जी जिंकते आई
ना उसासते ना खोळंबते जी
आजची आई आजची जिजाई ..!!

**- स्वाती फ़डणीस**

## नमन

गे माय मराठी शब्दफुलांचे हार तुला वाहतो
पदकमलांना क्षीरस्नान जणू नित्य तुझ्या घालतो
प्रसन्न होशी आम्हा पामरां आशिर्वच देऊनी
असेच राहो सदासर्वदा शब्दबहर उधळूनि

हो जी जी जी जी
माझे माऊली गे, ह्या नमनासी घे
हो जी जी जी
जी जी जी हो

सह्याद्रीची भूमी नटली अभंग साहीत्याने
शिवरायांनी येथ शिकवले जगणे अभिमानाने
वीर जाहले शूर जाहले रणांगणी जिंकले
विद्वानांचे ज्ञानदीपही चहुकडे उजळले

हो जी जी जी जी
माझे माऊली गे, ह्या नमनासी घे
हो जी जी जी
जी जी जी हो



वसा घेतला जन्म आमुचा तुजसाठी वेचण्या
पाऊल येथून मागे नाही फ़क्त पुढे चालण्या
तुकाराम-ज्ञानबा माऊली अमुची श्रद्धास्थाने
आम्ही चालवू थोर वारसा नित्य पुढे 'नेटा'ने

हो जी जी जी जी
माझे माऊली गे, ह्या नमनासी घे
हो जी जी जी
जी जी जी हो

महाभागांनी अपुली वचने तशीच मागे घ्यावी
नवी पिढी ही फ़ुसकी नाही उभी पाय रोवूनी
कंबर कसली रक्षण करण्या भाषा साहित्याचे
समर्थ आम्ही नसांत अमुच्या तप्त रक्त वाहते

हो जी जी जी जी
माझे माऊली गे, ह्या नमनासी घे
हो जी जी जी
जी जी जी हो

**- रसप**
**( रणजीत पराडकर )**

**राजे तुम्ही रक्त सांडले स्वराज्यासाठी......**

राजे तुम्ही रक्त सांडले स्वराज्यासाठी......
आम्ही आज तुमचे किल्ले बघतो केवळ मजेसाठी.....
तुमच्या मावळयांनी कडे चढ़ले तुमच्या स्वप्नांसाठी
आम्ही आडवाटेनेही थकुन जातो किल्ल्यावर जाण्यासाठी
तुमच्या सिंहाचे स्मारके आज युवकांचे दारुंचे अड्डे
सिंहगडाच्या पायथ्याशी रेव पार्टयांचे सडे
मराठ्यांच्या स्मारकांचे हे हाल आता बघवत नाही
मराठा असल्याचे किल्ल्यावर गेल्यावर बोलवत नाही
आमची मक्का मदिना आज धुळीखाली गाडली जात आहे
कधीकाळच्या राज्य कर्त्यांवर आज आरक्षण मागण्याची वेळ
लादली जात आहे
राज गड पासुन राय गडा पर्यंतच्या आजही शोधाव्या लागतात
वाटा
ह्या देशात तुम्ही होता म्हणुन आज होऊ शकले बिरला अन टाटा
शिर्डीच्या बाबांना सिंहासन अन छत्रपतीच्या समाधीला उन्हाच्या
झळा
मराठ्यांचे मंत्री अन राजकर्ते शिव जयंतीला निधी करोडोंचा
करतात गोळा
राजांच्या नावांवर आज निघतात कित्येक सेना
अन मराठी लोकांसाठी लढ़णा-यांच्या नावावर दाखल होतो गुन्हा
राजे बरं झालं तुम्ही लवकर गेले
नाहीतर हे दुखः तुम्हास सहन नसते झाले
तुमच्या नावासाठी लढताना मेले ते तुमचे मावळे
आज तुमच्या नावावर करतात राजकारण
अन भरतात आपली घरे ते आमचे डोम कावळे
नशिब राजे तुम्ही गड डोंगरावर बांधले
जर असते कशी जमीनीवर तर त्याचे सात बारा ह्यांनी नक्कीच
असते बदलले
कवी ग्रीष्म करतो सगळयांना एक विनंती
राखा पावित्र्य गडाचे आज
नाहीतर शोधावे लागतील पुरावे आपल्या इतिहासाचे......

**- कवी ग्रीष्म**



नेटाक्षरी हा अंक विनामूल्य वितरीत केला जातो
आपल्या सुचना ,टीका आणि सहकार्य यांचे स्वागत आहे .
netaksharee@gmail.com